**ग्राहक संरक्षण कायदा, १९८६ च्या तरतूदीनुसार राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाच्या गैरन्यायिक सदस्य पदी श्री.अनिल दत्तात्रयराव काळे यांची नियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. नियुक्ती-२०१८/प्र.क्र. १५८/ग्रासं-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय (वि.), मुंबई-३२.
दिनांक:- १८ फेब्रुवारी , २०१९

**वाचा:-** १) ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६ व महाराष्ट्र ग्राहक संरक्षण नियम, २०००
२) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांचे पत्र क्र.राआ/महा./आस्था-३/राआ-सदस्य-भरती/२०१८/६३, दि.२९.१०.२०१८.

**शासन निर्णय:-**

ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६ च्या तरतुदीनुसार ग्राहकांच्या तक्रारींचे निराकरण करण्यासाठी राज्यामध्ये राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाची स्थापना करण्यात आली आहे. राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगामध्ये गैरन्यायिक सदस्य नेमणुकीबाबत दि.२२.०५.२०१७ रोजी निवडसमितीची बैठक संपन्न झाली. या बैठकीत राज्य आयोगात नजिकच्या काळात रिक्त झालेल्या गैर-न्यायिक सदस्य पदावर श्री.अनिल दत्तात्रयराव काळे यांची नियुक्ती करण्याची शिफारस समितीने केली. त्यानुषंगाने श्री. अ.द. काळे यांचे नियुक्ती आदेश निर्गमित करावे, अशी विनंती राज्य आयोगाच्या संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये केली आहे. त्यानुसार राज्य ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६ च्या कलम १६ (३) अन्वये श्री. अनिल दत्तात्रयराव काळे यांची, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाच्या गैर न्यायिक सदस्य पदी (Non-Judicial Member) खालील अटींच्या अधीन राहून या आदेशाच्या दिनांकापासुन नियुक्ती करण्यात येत आहे :-

१) अनिल दत्तात्रयराव काळे यांची गैर न्यायिक सदस्य पदी नियुक्ती प्रथम ५ वर्षासाठी किंवा त्यांच्या वयाची ६७ वर्षे पूर्ण होई पर्यंत किंवा पुढील आदेशापर्यंत यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत करण्यात येत आहे.

२) त्यांनी या पदाचा कार्यभार स्विकारल्यापासून १ वर्षाचा परिविक्षाधीन कालावधी (Probation Period) राहील.

३) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाच्या गैर न्यायिक सदस्य यांना महाराष्ट्र ग्राहक संरक्षण नियम, २००० च्या नियम ७ मधील पोटकलम १ व त्यामध्ये वेळोवेळी केलेल्या सुधारणेनुसार वेतन व भत्ते अनुज्ञेय राहतील.

४) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाचे गैर न्यायिक सदस्य आयोगाच्या कामासाठी दौऱ्यावर असताना राज्य शासनाच्या प्रथम श्रेणी अधिकाऱ्यांना अनुज्ञेय असलेला प्रवास व दैनिक भत्ता मिळण्यास पात्र असतील. परंतु त्यांना विमानप्रवास तसेच वातानुकूलित प्रथम वर्गाचा रेल्वे प्रवास अनुज्ञेय असणार नाही.

५) महाराष्ट्र ग्राहक सरंक्षण नियम २००० मधील ७(४) व त्यामध्ये वेळोवेळी केलेल्या सुधारणेनुसार राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाच्या गैर न्यायिक सदस्यांना पदावरून दूर करता येईल.

६) ग्राहक संरक्षण कायदा १९८६ च्या कलम १६ (१) (ब) (२) नुसार अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, महाराष्ट्र यांना असलेल्या अधिकारान्वये लोकहितास्तव किंवा प्रशासकीय कारणास्तव आवश्यक वाटल्यास संबंधित गैर न्यायिक सदस्यांची बदली राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग किंवा राज्य आयोगाच्या अधिनस्त परिक्रमा खंडपीठात करण्यात येईल.

७) त्यांच्या सेवाविषयक बाबी ग्राहक संरक्षण कायदा, १९८६ व महाराष्ट्र ग्राहक संरक्षण नियम, २००० व त्यामधील सुधारणेनुसार राहतील.

८) संबंधित गैर न्यायिक सदस्यांची नियुक्ती वैद्यकीय तपासणी व पोलीस पडताळणी अहवालाच्या अधीन राहून करण्यात येईल. ज्यांचे वैद्यकीय तपासणी तपासणी व पोलीस पडताळणी अहवाल योग्य नसतील/त्यामध्ये काणतेही प्रतिकुल शेरे नमूद केलेले असतील अशा संबंधित गैर न्यायिक सदस्यांची नियुक्ती रद्द करण्यात येईल.

९) सदर गैर न्यायिक सदस्यांची नियुक्ती त्यांनी विहित नमुन्यातील शपथपत्र व हमीपत्र लिहून दिल्यानंतर व त्यांनी त्यांच्या पदाचा कार्यभार स्विकारल्यांनतर प्रभावी होईल.

१०) महाराष्ट्र ग्राहक संरक्षण नियम, २००० मधील तरतूदीनुसार राज्य आयोगाच्या गैर न्यायिक सदस्यांना पदावरुन दूर करता येईल.

११) गैर न्यायिक सदस्यांच्या नियुक्तीचे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून १५ दिवसांत त्यांनी पदभार न स्विकारल्यास त्यांची नियुक्ती आपोआपच रद्दबातल होईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

२. उपरोक्त बाबींसाठी होणार खर्च, मागणी क्र.एम-२ "२४०८-अन्न साठवण व वखार साठवण (०४) (००) ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६ अंतर्गत राज्य ग्राहक संरक्षण परिषद, राज्य आयोग आणि जिल्हा मंचाची स्थापना करणे (०४) (०१) मुंबई शहर (२४०८ ०२५१) ०१" या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. उक्त शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. **२०१९०२१८१६०१०७१३०६** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhaskar Baburao Patil

Digitally signed by Bhaskar Baburao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplier And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bbb17268641691acddf048e6aa2150f79b022d09a6c745e92beb9baeed480e62, serialNumber=c8c342ac9a89937bf462ee75f46842ac6d1fbc12a95dda7bfd1d06d7b79b4191, cn=Bhaskar Baburao Patil
Date: 2019.02.18 16:03:04 +05'30'

**( भा.बा.पाटील )**
उप सचिव, महारारष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा.मंत्री (अ.ना.पु.व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव.
४) मा.राज्यमंत्री (अ.ना.पु.व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव.
५) प्रधान सचिव, (विधी व न्याय), मंत्रालय, मुंबई
६) अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई.
७) प्रधान सचिव, (अ.ना.पु.व ग्रा.सं.वि.) यांचे स्वीय सहायक.
८) उप सचिव, गां.सं.४ (अ.ना.पु.व ग्रा.सं.वि.)
९) वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय, मुंबई.
१०) प्रबंधक, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई
११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ मुंबई,/नागपूर
१२) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र ½ मुंबई,/नागपूर
१३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१४) श्री.सुधीर माणिकराव खानापुरे, गैर न्यायिक सदस्य, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई
१५) निवडनस्ती, ग्रासं-४.